दहशतवाद विरोधी पथक गु.नों.क्र.०८/२०१० मधून उद्‌भवलेल्या आणि सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल प्रकरणी शासनातर्फे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्रीमती रोहिणी सॅलियन यांना व्यावसायिक फी मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एसपीपी २०१०/प्र.क्र.३५१/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : २४ फेब्रुवारी ,२०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-२०११/प.एस.६/डी-चौदा, दिनांक २.२.२०११

<u>शासन निर्णय</u> :- दिनांक १३.३.२०१० रोजी दहशतवाद विरोधी पथक पोलीस ठाणे, मुंबई गु.नों.क्र.०८/२०१०(कलम १८-अ, १८ बेकायदेशीर कारवाया (प्रतिबंधात्मक) कायदा १९६७) प्रमाणे गुन्हा नोंद करण्यात येऊन गुन्हयातील आरोपी अब्दुल लतीफ अब्दुल रशीद शेख उर्फ गुड्डू, रा. बांद्रा, मुंबई आणि रियाज अली अबुबकर शेख उर्फ रियान, रा. दहिसर, मुंबई यांना अटक करण्यात आली. तसेच, सदर गुन्हयात पाकिस्तानस्थित इसम नामे अंकल हा पाहिजे आरोपी असून त्याचे नांव बशिर अहमद ऐनुलहक खान असुन तो सन १९९३ साली मुंबई शहरात निरनिराळ्या ठिकाणी घडवुन आणलेल्या व त्यामुळे मोठया प्रमाणात मनुष्य व वित्तहानी झालेल्या बॉम्बस्फोटातील एक फरारी आरोपी आहे. सदर गुन्हयातून उद्‌भवलेल्या आणि सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल प्रकरणामध्ये शासनाच्या वतीने काम पाहण्यासाठी ॲड. श्रीमती रोहिणी सॅलियन यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २.२.२०११ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे.

२. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्रीमती रोहिणी सॅलियन यांना 'विचारविनिमय फी या प्रकरणात देय असलेल्या परिणामकारक सुनावणी फीच्या ५० % पेक्षा जास्त असू नये' या अटीवर खालीलप्रमाणे फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु. १०,०००/-

(२) प्रतिदिन विचारविनिमय फी - रु. ३,०००/-

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस .. आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर- १५१/११/व्यय-७, दिनांक १७.२.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२२४१४४९५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
ॲड.श्रीमती रोहिणी सॅलियन, १९ शैला महल, पहिली पास्ता लेन, कुलाबा,मुंबई.
निवड नस्ती (पोल-१०)